आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे सिंधुदुर्ग-ओरोस येथील स्मारक व पत्रकार भवन बांधकामास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः स्मारक-२०१६/प्र.क्र.१९२/योजना-११

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २८ डिसेंबर, २०१८.

**वाचा :**

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.१९२/पंरा-९, दिनांक १७.११.२०१६.
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.१९२/पंरा-९, दिनांक १९.६.२०१७.

**प्रस्तावना :**

जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी दिनांक २१.७.२०१६ च्या पत्रान्वये, आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे स्मारक व पत्रकार भवन मौजे सिंधुदुर्गनगरी-ओरोस येथील स्मारक बांधकामासाठी रु.४५५/- लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून त्यास शिखर समितीने मान्यता दिली आहे. सबब, स्मारक व पत्रकार भवन बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांच्या नांवाने सिंधुदुर्ग नगरी ओरोस येथील सिंधुदुर्ग जिल्हा मराठी पत्रकार संघ येथील जागेवर स्मारक व पत्रकार भवनाच्या बांधकामाच्या रुपये ४५५/- लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष फक्त) इतक्या आराखडयास संदर्भाधिन दिनांक १७.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. त्यानुषंगाने आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांचे सिंधुदुर्ग-ओरोस येथे स्मारक व पत्रकार भवनाचे बांधकाम सुरु करण्यासाठी रुपये ३.०० कोटी (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त निधीतून खर्च करण्याकरिता सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, सिंधुदुर्ग (सांकेतांक क्रमांक १५०१००१०३९) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर स्मारकावरील खर्चाची जबाबदारी जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांची राहील. त्यांनी स्मारकाच्या कामाची प्रगती तसेच उपयोगिता संबंधिची माहिती, उपयोगिता प्रमरणपत्रास वेळोवेळी शासनास सादर करावी व महालेखापालांच्या लेख्याशी खर्चमेळाबाबतची कार्यवाही करावी. तसेच शासकीय स्मारक असल्याने प्रश्नांकीत जागा शासनाच्या नांवे करणे इ. पुढील कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर स्मारकाच्या बांधकामावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी स्मारक समितीची राहील.

५. सदर खर्च हा लेखाशिर्ष-मागणी क्रमांक-एल-३, २०१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९६ जिल्हा परिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभरण्याकरिता अनुदान (२५१५२४८६), ३१ सहायक अनुदान (योजनांतर्गत) या लेखाशिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन, अनुक्रमांक-४ नियम-२७ (२) अन्वये, अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी पर्यंतच्य प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकारी प्रशासकीय विभागास आहेत. यानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४१०, दिनांक १०.११.२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201812281445499720 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2018.12.28 15:15:09 +05'30'

**मनोज जाधव**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.पालक मंत्री, सिंधुदुर्ग जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर

९. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण.
११. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
१३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदुर्ग.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
१६. सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, सिंधुदुर्ग.
१७. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग.
२१. निवड नस्ती (यो-११). ग्राम विकास विभाग.